# महाराष्ट्र शासन

सामान्य प्रशासन विभाग,
परिपत्रक क्रमांकः एसटीके-१०९९/प्र.क्र.३१/९९/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः १२ ऑगस्ट, १९९९

## परिपत्रक

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, शासकीय कर्मचा-यांमधील काही गट त्यांच्या विविध मागण्यांकरीता संपावर जाण्याचा इशारा देत आहेत. त्याप्रमाणे सदर कर्मचा-यांचे गट जाहीर सभा घेत असून अशा सभांमध्ये विविध राजकीय पक्षांचे नेते सहभागी होत असल्याचे देखिल शासनाच्या निदर्शनास आले आहे. कर्मचा-यांच्या अशा सभांमध्ये राजकीय पक्षांच्या नेत्यांची/प्रतिनिधींची उपस्थिती/सहभाग/भाषणे या बाबी निवडणूकीच्या आदर्श आचारसंहितेचा भंग करणारे ठरतात.

२. महाराष्ट्रात लोकसभा तसेच विधानसभेच्या सार्वत्रिक निवडणूकीचा कार्यक्रम निवडणूक आयोगाने जाहीर केला असून जवळपास सर्वच शासकीय कर्मचारी कोणत्या ना कोणत्या स्वरुपात निवडणूकीच्या प्रक्रियेत सहभागी होणार आहेत. निवडणूकीच्या कालावधीमध्ये शासकीय कामकाजात कोणत्याही प्रकारचा अडथळा निर्माण करणारे आंदोलन करणे, संपावर जाणे, सामुहिक रजा घेणे, शासकीय धोरणांचा निषेध करणा-या कृती/निदर्शने करणे अथवा तत्सम कृत्य करण्यास प्रवृत्त करणे यामुळे निवडणूक प्रक्रियेवर विपरीत परिणाम होण्याची शक्यता आहे. यास्तव सर्व शासकीय/निमशासकीय/जिल्हा परिषद कर्मचा-यांच्या असे निदर्शनास आणून देण्यात येत आहे की, निवडणूक प्रक्रियेवर विपरीत परिणाम करणारी किंवा त्यात अडथळा आणणारी कोणतीही कृती ही लोकप्रतिनिधीत्व कायद्याचा व निवडणूक आचारसंहितेचा भंग करणारी ठरेल.

३. सर्व शासकीय विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख व इतर सर्व प्रशासकीय अधिकारी यांना सूचित करण्यात येते की, सदर परिपत्रक त्यांनी त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कर्मचा-यांच्या निदर्शनास आणून द्यावे आणि कर्मचा-यांना वरील परिच्छेदात नमूद केलेली कोणतीही आंदोलनात्मक कृती करण्यापासून परावृत्त करावे.

(कृ.मा.प.

४. हे आदेश मुख्य निवडणूक अधिकारी व प्रधान सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( ज. ना. कुलकर्णी)
**शासनाचे उप सचिव**

प्रति,

❖ मा. राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
❖ सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
❖ प्रबंधक, लोकआयुक्त/उप लोकआयुक्त, महाराष्ट्र,
❖ सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
मुख्य सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव,
मुख्य निवडणूक अधिकारी व प्रधान सचिव, सा.प्र.वि.,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त/जिल्हाधिकारी,
सर्व विभागप्रमुख/कार्यालयप्रमुख,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

❖ (पत्राने)

---------

एच-636(4000-8-99)-अ.